**भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर (अनूसूचित जाती /जमाती) उद्योजकांसाठी विशेष सामुहिक प्रोत्साहन योजनेंतर्गत उद्यम भांडवल निधीपोटी रू. ३२.७० कोटी रक्कम अदा करण्यासाठी सदर निधी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे वळविण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्र. साप्रोयो-२०१७/प्र.क्र. ३९ /उद्योग-८,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक -०६ मार्च, २०१७

<u>वाचा:-</u> १) शासन निर्णय क्र. साप्रोयो-२०१५/ प्र.क्र. १३३/ उद्योग-८ दिनांक ११/२/२०१६

२) शासन परिपत्रक क्र. पूरक -२०१६/प्र.क्र.१२८/अर्थसंकल्प-३ दिनांक १२/८/२०१६.

३) शासन निर्णय क्र.पूरक-२०१६/(प्र.क्र. ५९)/ प्रशासन-१, दिनांक २०/८/२०१६.

४) शासन शुध्दीपत्रक दिनांक ०५ जानेवारी,२०१७

५) उद्योग संचालनालयाचे पत्र क्र. उ.सं.साप्रोयो / विप्रोयो /उभांनिधी/ २०१६/अे-३०१, दिनांक ०८.०२.२०१७

**<u>प्रस्तावना:-</u>**

शासनाने अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीच्या उद्योजकांसाठी भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर(अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती) विशेष सामुहिक प्रोत्साहन योजना संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये जाहिर केली आहे. संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये सदर योजनेच्या खर्चासाठी सामाजिक न्याय विभागाकडून सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात पुरवणी मागणीद्वारे रू. ५६ कोटी निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे. भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर (अनूसूचित जाती /जमाती) उद्योजकांसाठी विशेष सामुहिक प्रोत्साहन योजनेतील (शासन निर्णय क्र. साप्रोयो २०१५/प्र.क्र.१३३/ उद्योग-८, दि. ११/०२/२०१६) परि. क्र. ५ अंतर्गत देण्यात येणाऱ्या "उद्यम भांडवल निधी" करीता एकूण रु.५०.०० कोटी इतकी तरतुद अर्थसंकल्पीत करण्यात आलेली आहे. ( सामाजिक न्याय विभागाकडून रु.३३ कोटी व आदिवासी विकास विभागाकडून रु.१७ कोटी) सदर निधी नव्याने सुरु होणाऱ्या उत्पादन उद्योग घटकांसाठी व्यवहार्य तफावत निधी म्हणून देण्यात येणार आहे.

शासन शुध्दीपत्रक दि.५.१.२०१७ मध्ये नमूद केल्याप्रमाणे उद्यम भांडवल निधीच्या व्यवस्थापनासाठी मे.भारतीय औद्योगिक विकास बँक (IDBI Venture Capital Fund Ltd. (ICMS) या संस्थेची नियुक्ती करण्याबाबत तसेच अनुसूचित जातीच्या उद्योजकांसाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडून प्रत्यक्ष वापरासठी उपलब्ध झालेल्या रु.४४.८० कोटी इतक्या निधीपैकी रु. ३२.७० कोटी निधी 'उद्यम भांडवल निधी म्हणून वितरीत करण्यासाठी सदर निधी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे वर्ग करण्यास मंजूरी देण्याबाबत उद्योग संचालनालयाने उपरोक्त संदर्भांकित क्र. ४ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर (अनूसूचित जाती व अनुसूचित जमाती) उद्योजकांसाठी विशेष सामुहिक प्रोत्साहन योजनेतील 'उद्यम भांडवल निधीच्या व्यवस्थापनाकरीता मे.भारतीय औद्योगिक विकास बँक (IDBI Venture Capital Fund Ltd. (ICMS) या संस्थेची नियुक्ती करण्यात येत आहे. तसेच या संस्थेच्या कामकाजासाठी निधी उपलब्ध करण्यासाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदीतून रु. ३२.७० कोटी इतका निधी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळास वळता करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम अदा करण्यासाठी सन २०१६-२०१७ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला असून या विभागाच्या अर्थसंकल्प कक्षाकडून संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेली सदर रक्कम नियंत्रक अधिकाऱ्याकडे सुपूर्द करण्यात आली आहे.

३. सदरची तरतूद आहरित करण्यासाठी लेखाधिकारी, उद्योग संचालनालय, मुबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व अतिरिक्त विकास आयुक्त (उद्योग) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबत तसेच महालेखापाल यांच्या लेख्याशी खर्च ताळमेळ घालण्याची कार्यवाही करावी. सदर निधी प्रत्यक्षात वितरित झाल्यानंतर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल यांना पाठवून त्याची प्रत शासनास सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्याची राहील.

४. सदर रकमेपोटी होणारा खर्च “मागणी क्र. के-७, मुख्य लेखाशीर्ष-२८५२, उद्योग ८०, सर्वसाधारण, ७८९, अनुसुचित जाती उपयोजना, (०१) (०१) अनूसूचित जातीच्या उद्योजकांसाठी भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर प्रोत्साहन योजना (योजनांतर्गत) २८५२ ए ००४ ) ” या लेखाशीर्षाखाली सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षातील मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग ४ मधील खर्चाच्या संकिर्ण बाबीसंबंधी प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार अनुक्रमांक -११ अनुसार व वित्त विभागाचे परिपत्रक क्र. पुरक २०१६/ प्र.क्र.१२८/ अर्थ-३ दिनांक १२/८/२०१६ व अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दिनांक २०/४/२०१६ मधील परिच्छेद ७ (अ) (ब) (क) व परिच्छेद ८ अनुसार प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. प्रमाणित करण्यात येते की, सदर शासन निर्णयातील निधी वितरित करताना वित्त विभागाचे परिपत्रक क्र. क्र. अर्थसं २०१६/ प्र.क्र. ८९/ अर्थ-३ दिनांक २०/४/२०१६ मधील परिच्छेद ७ (अ) (ब) (क) व परिच्छेद ८, ९ व १४ येथे नमूद अटींची पुर्तता होते. सदर परिपत्रकातील परिच्छेद क्र. १०, ११,१३,१५,१७ व १८ येथील अटी या योजनेस लागू होत नाहीत. तसेच वित्त विभागाच्या सदर परिपत्रकासोबत असलेल्या परिशिष्ट मधील अ.क्र. ९ येथे नमूद तपासणी सुचीचा अवलंब करण्यात आलेला आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१७०३०६१७१९००४४१० असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने.

Shraddha Deven Kocharekar

Digitally signed by Shraddha Deven Kocharekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=IELD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=189da489d797e1e6a67b7d97496ef70683916299eab51c867c5a13147d142a80, cn=Shraddha Deven Kocharekar
Date: 2017.03.06 17:21:17 +05'30'

**( श्रध्दा कोचरेकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. विकास आयुक्त ( उद्योग ), उद्योग संचालनालय, मुंबई-३२.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
३. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
४. व्यवस्थापकीय संचालक, IDBI Venture Capital Fund Ltd.मुंबई.
५. संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२.
६. सहायक संचालक, (वित्त व लेखा), उद्योग संचालनालय, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, /निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
८. उपसचिव ( प्रशासन), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. कक्ष अधिकारी, प्रशासन-१, उ.ऊ. व का.वि., मंत्रालय, मुंबई-३२.
१०.निवड नस्ती ( उद्योग-८).